केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मूलन कार्यक्रमांसाठी अनुसुचित जाती उप योजनेंतर्गत (SCSP) सन २०१६-१७ मधील केंद्र हिश्श्यापोटी रू. ४१.६३ लक्ष (पहिला हफ्ता) अनुदान वितरीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः निधीवि-२०१७/प्र.क्र.११७/२०१७/आ-७**
१० वा मजला , गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ३१ मार्च, २०१७

**वाचा :-**

१) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. No. W-११०३६/01/२०१६-Lep/ SC(Pt-I), दिनांक ०५.०१.२०१७.
२) सहसंचालक, आरोग्य सेवा, (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे-६ यांचे क्र. ससंआसे/कुष्ठवक्षय/कक्ष-लेप्रसीसोसा/४९४१-४८/२०१७, दि. ०९.०३.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रम सन १९५५-५६ साली पाहणी, शिक्षण व उपचार या तत्वावर एक उद्देशिय पध्दतीने राबविण्यास सुरुवात झाली. सन १९८१-८२ पासून प्रभावी औषधोपचाराचा समावेश असलेली बहुविध औषधोपचार पध्दती राज्यात टप्प्याटप्प्यात लागू करण्यात येऊन १९९५-९६ सालापर्यंत राज्यातील सर्व जिल्हे या योजनेंतर्गत आणण्यात आले. या कार्यक्रमाचे उद्दिष्टे पुढीलप्रमाणे : अ) देशातील सर्व जिल्ह्यात कुष्ठरोग निर्मुलनाचे ध्येय साध्य करणे. ब) विकृती प्रतिबंध आणि पुर्नरचनात्मक शस्त्रक्रियेद्वारे विकृती दर्जा २ चे प्रमाण कमी करणे. केंद्र शासनाने राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राबविण्यात येणाऱ्या कार्यक्रमांना सन २०१४-१५ या आर्थिक वर्षापासुन दिला जाणारा निधी राज्याच्या एकत्रित निधीद्वारे वितरीत करण्याच्या सुचना दिल्या आहेत. केंद्र शासनाने ६०% केंद्र हिश्श्यापोटी सामाजिक विशेष घटक (SCSP) वर्गवारीकरीता सन २०१६-१७ साठी पहिला हफ्ता वितरीत केला असुन सदर अनुदान राज्य

आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता या बाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय- :-

राज्यामध्ये राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमांतर्गत या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत अनुसुचित जाती उपयोजनेंतर्गत (SCSP) लाभार्थ्यांकरिता सन २०१६-१७ साठी ६०% केंद्र हिश्श्यापोटी रु. ४१.६३ लक्ष (रुपये एक्केचाळीस लक्ष त्रेसष्ठ हजार फक्त) इतकी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, पुणे यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च मागणी क्र.आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; ७८९ - अनुसुचित जातीसाठी विशेषघटक योजना (०१) अनुसुचित जाती उपयोजनेतंर्गत योजना; (०१) (१२) राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत योजना (केंद्राचा हिस्सा ६०%) (२२१०F५७८) - ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-१७ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१३/प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग, दिनांक १.१२.२०१६ मधील तरतुदी नुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकिय मान्यता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १५९/अर्थोपाय, दिनांक २७ मार्च, २०१७ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११८५३१५७२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: CN = Sanjay R More, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.03.31 19:23:51 +05'30'

**( सं. रा. मोरे )**
**महाराष्ट्र शासनाचे उप सचिव**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कु.क. कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणॆ .
७. सहायक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
८. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग ( अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१४. निवडनस्ती ( आरोग्य -७).